**संजय गांधी राष्ट्रीय उद्यानातील रखरखावाच्या अनुषंगाने माहे जुलै-२०२० ते मार्च-२०२१ या कालावधीकरीता आवश्यक असलेला निधी संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्वीय प्रपंची लेखामधून खर्च करण्यास परवानगी देण्याबबात.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०६.२०/प्र.क्र.८१/फ-१**
मंत्रायल, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १०.११.२०२०.

**वाचा :-**

१. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं-२०२०/प्र.क्र. ६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२०.
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक - संकिर्ण-२०२०/प्र.क्र. ६७/कोषा-प्रशा-५, दिनांक २६.०५.२०२०.
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०६.२०/प्र.क्र. ८१/फ-१, दिनांक : ०९.०७.२०२०
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६)/ कॅम्पा/ प्र.क्र. ७३/१४५६/२०१९-२०२०, दिनांक : १९.१०.२०२०.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये जारी केलेल्या मार्गदर्शक सुचनान्वये सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात माहे एप्रिल, २०२० ते माहे जून, २०२० या कालावधीत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या रखरखाव व इतर आवश्यक कामकाजाकरीता आवश्यक असलेल्या रु. २३३.११ लक्ष निधी संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्वीय प्रपंची लेख्यातील उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च करण्याकरीता संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात आली आहे.

२. सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात माहे जुलै, २०२० ते मार्च, २०२१ या कालावधीत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या रखरखाव व इतर आवश्यक कामकाजाकरीता आवश्यक असलेल्या रु. ५२२.०४ लक्ष निधी संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्वीय प्रपंची लेख्यातील उपलब्ध असलेल्या निधीमधून करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

सबब आता सदर शासन निर्णयान्वये संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासन मान्यतेसाठी सादर केलेला प्रस्ताव व सोबत जोडलेल्या सहपत्रानुसार सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षात माहे जुलै, २०२० ते मार्च, २०२१ या कालावधीत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या रखरखाव व इतर आवश्यक कामकाजाकरीता आवश्यक

असलेल्या बाबींकरीता रु. ५२२.०४ लक्ष निधी संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या स्वीय प्रपंची लेख्यातील उपलब्ध असलेल्या निधीमधून खर्च करण्यास खालील अटींवर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रीक व प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

II. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

III. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी. यामध्ये कुठलीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घावी.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२८/कोषा प्रशा-५, दिनांक ०२.११.२०२० अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११०१५४४३०४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2020.11.11 13:15:37 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
२. प्रधान सचिव (लेखा व कोषागार), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
३. सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
८. वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान,बोरीवली.
९. सह सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.

१०.उप सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
११.कक्ष अधिकारी, कोषाप्रशा-५, वित्त विभाग, मंत्रायल, मुंबई - ४०० ०३२.
१२.महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
१३.फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्रमांक:- डब्ल्यूएलपी ०६.२०/प्र.क्र. ८१/फ-१, दिनांक :- १० नाव्हेंबर, २०२० सोबतचे सहपत्र.**

| संजय गांधी राष्ट्रीय उद्यान बोरीवली मधील स्वीय प्रपंची लेखा अंतर्गत सन २०२०-२१ करिता माहे जुलै-२०२० ते मार्च-२०२१ च्या खर्चाकरिता प्रस्तावित रक्कम. | | | | |
|---|---|---|---|---|
| मनोरंजन क्षेत्रात असलेल्या उपवन आणि बालोद्यानाच्या रखरखाव आणि विकास | | | | (रु.लाखात) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | १ . (अ) मजुरी | माहे जुलै-२०२० ते मार्च-२०२१ करिता प्रस्तावित रक्कम | माहे जुलै-२०२० ते ऑगस्ट-,२० मध्ये झालेला खर्च | उर्वरित प्रस्तावित रक्कम |
| १ | कृष्णागिरी उपवन वनक्षेत्रातील विविध रोजंदारी कामे जसे साफसफाई, देखभाल, संरक्षण इ.साठी कुशल, अकुशल उक्ते कामांची वाढीव दराने लागणारी मजुरी (कुशल मजुर २८ व अकुशल मजुर १८७ एकूण उक्ते मजूर २१५ मजुर. | १७०.४५ | १.२८ | १६९.१७ |
| २ | येऊर परिक्षेत्रासाठी मानपाडा, ससुपाडा विश्रामगृह व इत्यादी निसर्ग परिचय साफसफाई देखभालसाठी लागणारी मजुरी ( २५ अकुशल व ८ कुशल एकूण ३३ मजुर ) व जंगल संरक्षण कामाची मजुरी | ३७.८८ | २.३४ | ३५.५४ |
| ३ | तुळशी लॉगहट रखरखाव व कान्हेरी परिमंडळ, रावळपाडा / मालाड रोपवन / घाणीखाचर / आंतरराष्ट्रीय प्राणीसंग्रहालय व पिल्टरपाडा / ठाकुरपाडा बॅरिअर गेट / तारासिंग गार्डन येथे लागणारी मजुरी (उक्ते मजुर - ५७) व जंगल संरक्षण कामाची मजुरी | ५५.९३ | २.४७ | ५३.४६ |
| | एकूण १. (अ) रु. | २६४.२६ | ६.०९ | २५८.१७ |
| | (ब) रखरखाव खर्च | | | |
| १ | कृष्णगिरी उपवन परिक्षेत्रातील शासकीय कार्यालये व विश्रामगृहांचे विद्युत, टेलिफोन, पाणीबिल व विद्युत साहित्य प्लंबिग साहित्य खरेदी उद्यानासाठी लागणारे साहित्य व कार्यालयीन खर्च यासाठी आवश्यक रक्कम. | ४२.६३ | ३.३४ | ३९.२९ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | येऊर परिक्षेत्रातील शासकीय कार्यालये व विश्रामगृहांचे विद्युत, टेलिफोन, पाणीबिल व विद्युत साहित्य प्लंबिग साहित्य खरेदी उद्यानासाठी लागणारे साहित्य व कार्यालयीन खर्च यासाठी आवश्यक रक्कम. | १०.३७ | . . . | १०.३७ |
| ३ | तुळशी परिक्षेत्रातील बांधील स्वरुपाची कामे शासकीय कार्यालये पाणीबिल व विद्युत साहित्य प्लंबिग साहित्य खरेदी उद्यानासाठी लागणारे साहित्य व कार्यालयीन खर्च यासाठी आवश्यक रक्कम. | ५.९२ | . . . | ५.९२ |
| ४ | कृष्णगिरी उपपवन बोरीवली परिक्षेत्रातील मिनी ट्रेन व टेम्पो क्र. MH-०४-AM-३७० जीप क्र. MH-०४-AN-३२८२ व जीप क्र. MH-०४-AN-३७७४ करिता वंगण व किरकोळ दुरुस्ती खर्च. | ६.२५ | . . . | ६.२५ |
| ५ | येऊर परिक्षेत्रातील शासकीय वाहनांसाठी इंधन व दुरुस्ती खर्च | ५.५ | . . . | ५.५ |
| ६ | तुळशी परिक्षेत्रातील शासकीय वाहनांसाठी इंधन व दुरुस्ती खर्च | ९.२ | . . . | ९.२ |
| ७ | कृष्णगिरी उपवन बोरीवली परिक्षेत्रातील उद्यान व शासकीय विश्रामगृहे देखभाल खर्च.(माहे एप्रिल-२० ते मार्च-२१) | २५.०० | . . . | २५.०० |
| ८ | येऊर परिक्षेत्रातील उद्यान व शासकीय विश्रामगृहे देखभाल खर्च.(माहे जुलै-२०२० मार्च-२०२१) | ३.५३ | . . . | ३.५३ |
| ९ | तुळशी परिक्षेत्रातील उद्यान व शासकीय विश्रामगृहे देखभाल खर्च. (माहे जुलै-२०२० मार्च-२०२१) | १.५५ | . . . | १.५५ |
| | एकूण १. (ब) रु. | १०९.९५ | ३.३४ | १०६.६१ |
| | एकूण एकंदर (अ+ब) | ३७४.२१ | ९.४३ | ३६४.७८ |
| | २) व्याघ्र सफारी आणि सिंह सफारीचे रखरखावाकरिता | | | |
| १ | सिंह विहार / व्याघ्र विहार मधील मजुरांची मजुरी सुधारीत दरानुसार (कुशल १४ अकुशल ४७ मजुर एकूण - ६१ मजूर) | ५०.१७ | ४.७५ | ४५.४२ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | मिनी बसेस ३ इतर वाहन सुमो नं. ३२८२, इंडिगो नं. ०६३ करिता इंधन १.६० लक्ष प्रतिमहा - ४.८० लक्ष तिमाहीसाठी दुरुस्ती ०.६० लक्ष प्रतिमहा - १.८० लक्ष तिमाहीसाठी | १८.५५ | ... | १८.५५ |
| ३ | उद्यानातील बंदिस्त प्राणी व इतर प्राण्यांसाठी औषधे खरेदी, आहारावरील इत्यादी अत्यावश्यक खर्च (एकूण प्राणी-२५) (सिंह-३, वाघ-७ बिबट-१४, गिधाड-१) तसेच तणभक्षक प्राणी यांचे खाद्य (चुना भुशी गाजर वैगरे.) | ५९.६५ | ४.९१ | ५४.७४ |
| ४ | सिंह विहार परिक्षेत्रातील देखभाल दुरुस्ती, साखळी जाळी पिंजरे दुरुस्ती, बंदिस्त वन्यप्राण्यांचे पिंजरे, साफसफई व स्वच्छता साहित्य खरेदी (फिनाईल, झाडू , खराटा, डस्टर, साबण, निरमा पावडर, डांबर गोळी, ॲसिड, नॅपकिन इ. खरेदी कार्यालयीन खर्च व इतर किरकोळ इत्यादी आवश्यक खर्च | १०.३१ | ... | १०.३१ |
| ५ | पशुवैद्यकिय अधिकारी यांना जोखीम भत्ता. (प्रतिवर्षी १.२० लक्ष प्रमाणे सन २०२०-२१ करिता) | १.२० | ... | १.२० |
| ६ | Replace chainlink fencing with damaged pole at outer side of secondary cage no. ०१ & primary tiger cage No. ०२ (रु. २४८९०० + २४७७०० = ४९४६००) (अंदाज पत्रक मजुरं सन २०१९ -२०) | ४.९५ | ... | ४.९५ |
| ७ | रस्टी स्पोटेर्डकरिता पिंजरा तयार करण्याकरिता आरेखण करणे, तांत्रिक सल्ला मार्गदर्शन करणे फी ( दर पत्रक मजुरं सन २०१९ -२०) | ३.०० | ... | ३.०० |
| | एकूण (२) रु. | १४७.८३ | ९.६६ | १३८.१७ |
| | एकूण एकंदर (१ +२) रु. | ५२२.०४ | १९.०९ | ५०२.९५ |

********